'वृत्तपत्रांच्या व नियतकालिकांच्या जाहिरात विषयक धोरणात तसेच जाहिरातीच्या दरात सुधारणा करण्यासाठी नेमलेल्या मा. अनिल देशमुख समितीचा अहवाल'

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्र.पीयूबी-१०००/प्र.क्र.७३/२०००/३४
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक. १ मे, २००१

वाचा- (१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्र.पीयूबी.१०८६/१८०/३४, दि.२७ जून १९८९
(२) शासन शुध्दिपत्र, सामान्य प्रशासन विभाग, क्र.पीयूबी.१०८६/१८०/३४, दि.८ ऑगस्ट १९८९
(३) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्र.पीयूबी-१०८६/१८०/(८६)/३४, दि.३१ ऑक्टोबर १९८९
(४) शासन निर्णय,क्र.पीयूबी.१०९०/८८२/(१२४/९०)/३४,दि.२ जून १९९०

## शासन निर्णय

महाराष्ट्र शासनामार्फत वृत्तपत्र/नियतकालिकांना देण्यात येणा-या वर्गीकृत व दर्शनी जाहिरातींच्या वितरणावावत धोरण ठरविण्यासाठी तत्कालीन माहिती व जनसंपर्क राज्यमंत्री, डॉ.श्रीकांत जिचकार यांच्या अध्यक्षतेखाली शासनाने ऑगस्ट, १९८६ मध्ये समितीची नियुक्ती केली होती. या समितीने सादर केलेल्या अहवालातील शिफारशींवर आधारित शासकीय जाहिरात वितरण धोरणाची नियमावली तयार करण्यात आली. ही नियमावली २ जुन, १९९० चे जाहिरात वितरण धोरण म्हणून अमलात आहे.

जिचकार समितीने निश्चित केलेल्या जाहिरात वितरण धोरण नियमावलीला दहा वर्षा पेक्षा अधिक काळ उलटल्याने तसेच दरम्यानच्या काळात वृत्तपत्र क्षेत्रात झालेल्या एकूणच स्थित्यंतरामुळे प्रचलित शासकीय जाहिरात वितरण धोरणाचा पुनर्विचार करण्याची आवश्यकता निर्माण झाली होती.

वृत्तपत्र कागद, शाई व इतर पूरक सामुग्रीच्या दरांमध्ये झालेली लक्षणीय वाढ, अत्याधुनिक माहिती-तंत्रज्ञानामुळे वृत्तपत्र क्षेत्रात झपाट्याने होणारा बदल व जिचकार समिती धोरणातील काही नियमांबाबत झालेली कालबाह्यता विचारात घेऊन वृत्तपत्र क्षेत्रातील सर्व संबंधितांकडून दरवाढ तसेच सुधरित जाहिरात वितरण नियमावली तयार करण्याची सातत्याने मागणी होत होती. शासनाने दिनांक १० फेब्रुवारी, २००० रोजी राज्यमंत्री (माहिती व जनसंपर्क) श्री.अनिल देशमुख यांचे अध्यक्षतेखाली शासकीय जाहिरात वितरण धोरण निश्चिती संदर्भात पुनर्विचार समितीची स्थापना केली.

महाराष्ट्र राज्यात शासनामार्फत देण्यात येणाऱ्या जाहिरातींच्या वितरणात सुसूत्रता यावी, त्यात स्वेच्छाधिकाराला कोणत्याही पातळीवर वाव राहू नये, ते पारदर्शी असावे, सर्व वर्गातील वृत्तपत्रांची निकोप वाढ होऊन त्या सर्वांना न्याय देणारे असावे या दृष्टीने या सर्व बाबींचा आढावा घेऊन पुनर्विचार समितीने आता शासकीय जाहिरात वितरण धोरण - २००१ ची निश्चिती केली आहे.

पुनर्विचार समितीच्या या नवीन सुधारित जाहिरात धोरणाची अंमलबजावणी १ मे, २००१ पासून करण्यात येईल.

पुनर्विचार समितीने निश्चित केलेल्या जाहिरात वितरण धोरणावरील शासन निर्णयामुळे शासकीय जाहिरातींच्या वितरणाच्या संबंधित सामान्य प्रशासन विभागाकडून तसेच इतर शासकीय विभागांकडून वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेले सर्व शासनादेश, संदर्भाधीन निर्णय, परिपत्रके किंवा अन्य दस्ताऐवज प्रभावहीन ठरतील व त्या ऐवजी हे नवीन सुधारित शासकीय जाहिरात वितरण धोरण २००१ पूर्णत्वाने अंमलात येईल.

नवीन सुधारित धोरणाचा भाग म्हणून समितीच्या शिफारशींना मंत्रिमंडळाच्या बैठकीत मान्यता देण्यात आल्यानुसार नियमावलीच्या स्वरुपात तयार करण्यात आले आहे. ही नियमावली शासन निर्णयासोबत 'जोडपत्र-अ' म्हणून जोडण्यात आली आहे.

या नियमावलीला 'महाराष्ट्र शासनाचे शासकीय जाहिरात वितरण धोरण -२००१ असे संबोधण्यात येईल.

शासकीय जाहिरातींच्या वितरणासाठी वृत्तपत्र/नियतकालिकांच्या खपावर आधारित चढत्या भाजणीचे दर कोष्टक (Graded Shaduel Of Rates For Government Advertisements) या शासननिर्णयासोबत परिशिष्ट 'अ' मध्ये देण्यात आले असून या नियमावलीच्या अंमलबजावणीबरोबरच हे दरकोष्टक अमलात येईल.

# परिशिष्ट - अ

(अ) शासकीय जाहिरातींच्या वितरणासाठी वृत्तपत्र/नियतकालिकांच्या खपाच्या आधारावर चढत्या भाजणीचे दरकोष्टक (ग्रेडेड शेड्युल ऑफ रेटस्) खालीलप्रमाणे राहील.

(ब) नियमांच्या अंमलबजावणीच्या तारखेपासून हे दरकोष्टक अंमलात येईल.

| अ.क्र | खपानुसार गट प्रतींची संख्या | नवीन सुधारित जाहिरात दर प्रती कॉ.सें.मी. |
|---|---|---|
| १ | १००१ ते २००० प्रतीपर्यंत (साप्ताहिकांसाठी) | १६.०० |
| २ | २००१ ते ३००० प्रतीपर्यंत (दैनिके व साप्ताहिकांसाठी) | १८.०० |
| ३ | ३००१ ते ४००० प्रतीपर्यंत | २०.०० |
| ४ | ४००१ ते ५००० -''- | २२.०० |
| ५ | ५००१ ते ७,५०० -''- | २४.०० |
| ६ | ७५०१ ते १०,००० -''- | २६.०० |
| ७ | १०,००१ ते १२,५०० -''- | २८.०० |
| ८ | १२,५०१ ते १५,००० -''- | ३०.०० |
| ९ | १५,००१ ते १७,५०० -''- | ३२.०० |
| १० | १७,५०१ ते २०,००० -''- | ३४.०० |
| ११ | २०,००१ ते २२,५०० -''- | ३६.०० |
| १२ | २२,५०१ ते २५,००० -''- | ३८.०० |
| १३ | २५,००१ ते २७,५०० -''- | ४०.०० |
| १४ | २७,५०१ ते ३०,००० -''- | ४२.०० |
| १५ | ३०,००१ ते ३५,००० -''- | ४४.०० |
| १६ | ३५,००१ ते ४०,००० -''- | ४६.०० |
| १७ | ४०,००१ ते ५०,००० -''- | ५०.०० |
| १८ | ५०,००१ ते ६०,००० -''- | ५४.०० |
| १९ | ६०,००१ ते ७०,००० -''- | ५८.०० |
| २० | ७०,००१ ते ८०,००० -''- | ६२.०० |
| २१ | ८०,००१ ते ९०,००० -''- | ६६.०० |
| २२ | ९०,००१ ते १,००,००० -''- | ७०.०० |

१,००,००० (लाख) प्रतींच्यावर प्रत्येकी २५,००० हजार प्रतींच्या एका गटास रुपये ७.०० प्रमाणे व २,००,००० (दोन लाख) प्रतींच्यावर प्रत्येकी २५,००० हजार प्रतींच्या एका गटास रुपये ६.०० प्रमाणे दरवाढ देण्यात येईल.

या दरामध्ये खपनिहाय करावयची विभागणी खालीलप्रमाणे असेल व त्याप्रमाणे त्या वृत्तपत्रांना अतिरिक्त दर देण्यात येईल.

अ) १ लाख प्रतींच्यावर २५ हजाराच्या गटास द्यावयाच्या अतिरिक्त दराची विभागणी :

| | | |
|---|---|---|
| १,००,००० ते १,०५,००० | — | रु. १.०० |
| १,०५,००० ते १,१०,००० | — | रु. १.०० |
| १,१०,००० ते १,१५,००० | — | रु. १.०० |
| १,१५,००० ते १,२०,००० | — | रु. १.०० |
| १,२०,००० ते १,२५,००० | — | रु. ३.०० |

ब) २ लाख प्रतींच्यावर २५ हजाराच्या गटास द्यावयाच्या अतिरिक्त दराची विभागणी :

| | | |
|---|---|---|
| १,००,००० ते १,०५,००० | — | रु. १.०० |
| १,०५,००० ते १,१०,००० | — | रु. १.०० |
| १,१०,००० ते १,१५,००० | — | रु. १.०० |
| १,१५,००० ते १,२०,००० | — | रु. १.०० |
| १,२०,००० ते १,२५,००० | — | रु. २.०० |

(क) ह्याशिवाय खालील बाबींसाठी त्या बाबींची पूर्तता करणाऱ्या वृत्तपत्र/नियतकालिकांना त्याबाबतची संपूर्ण खात्री करुन घेतल्यानंतर दर मंजूर करण्यात येईल. त्या खास बाबी अशा

क -१. ए.बी.सी. प्रमाणपत्र धारण करणाऱ्या अ, ब, व क वर्ग वृत्तपत्रांना त्यांच्या मूळ दराच्या २५ टक्के अधिक दर दिला जाऊन त्यांचा दर निश्चित करण्यात येईल. ए.बी.सी. प्रमाणपत्र सादर करणाऱ्या वृत्तपत्रांच्या बाबतीत विक्री झालेल्या प्रतींची संख्या अधिक विनामूल्य वाटप केलेल्या प्रतींची संख्या मिळून येणारा आकडा हा खपाचा आकडा म्हणून ग्राह्य धरण्यात येईल.

क -२. वृत्तसेवा (जसे पी.टी.आय./यू.एन.आय.) ची सेवा असणाऱ्या वृत्तपत्र/नियतकालिकांना रुपये २.०० प्रमाणे प्रति कॉ.सें.मी. जास्त आकार देण्यात येईल.

क -३. स्वत:ची अत्याधुनिक संगणकविषयक सेवा (इंटरनेट - ई-मेल, मोडेम) असल्यास रुपये ३.०० प्रमाणे प्रति कॉ.सें.मी. जास्त आकार देण्यात येईल.

क -४.	अत्याधुनिक छपाई तंत्राचा वापर (फोटो कंपोझिंग - ऑफसेट) असल्यास रुपये २.०० प्रती कॉ.सें.मी. एवढा जास्त आकार देण्यात येईल..

क -५.	सलग २५ वर्षापेक्षा अधिक काळ प्रकाशित होणाऱ्या वृत्तपत्राला रुपये २.०० प्रमाणे प्रति कॉ.सें.मी. जास्त आकार देण्यात येईल.

## जोडपत्र 'अ'

## शासकीय जाहिरात वितरण धोरण – २००१ - 'नियमावली'

१)	ह्या नियमांना ''महाराष्ट्र शासनाचे शासकीय जाहिरात वितरण धोरण-२००१'' असे संबोधण्यात येईल. हे जाहिरात धोरण शासनाने स्वीकारल्यानंतर त्यातील तरतूदींच्या आधारे शासनमान्य यादीतील सर्व वृत्तपत्रांची छाननी संबंधित वृत्तपत्राच्या शासनमान्य यादीतील सद्याच्या खप व त्यांच्याकडे असलेल्या सुविधांच्या आधारे करण्यात येऊन जी वृत्तपत्रे निकपास पात्र ठरतील त्यांचे नवीन दर निश्चित करण्यात येतील. शासनमान्य यादीत समाविष्ट होण्याचा किमान खपाचा निकष वाढविल्याने सध्याच्या शासनमान्य यादीत असलेली परंतु या किमान खपाच्या निकषात पात्र न ठरणाऱ्या वृत्तपत्रांना त्यांचा खप सिद्ध करण्यासाठी तीन महिन्यांची संधी देण्यात येईल. यानंतरही जी वृत्तपत्रे निकषास पात्र ठरणार नाहीत त्यांना शासनमान्य यादीतून वगळण्यात येईल. दि.१ मे २००१ पासून या नवीन सुधारित जाहिरात वितरण धोरणाच्या नियमावलीची अंमलबजावणी करण्यात येईल व ही नियमावली सर्व संबंधितांना बंधनकारक राहील.

२)	व्याख्या :

या प्रयोजनासाठी संदर्भान्वये वेगळा असा अर्थ लावला नसल्यास पुढील ठळक संज्ञांचा वा उपाधींचा अर्थ खालीलप्रमाणे लावला जाईल.

२ - अ)	'शासन' या संज्ञेत 'महाराष्ट्र शासन' हा अर्थ अभिप्रेत आहे.

२ - ब)	'शासनमान्य जाहिरात' म्हणजे महाराष्ट्र शासनाच्या कोणत्याही विभागाकडून प्रसिद्धीसाठी देण्यात आलेली कोणतीही वर्गीकृत स्वरुपाची जाहिरात. तसेच शासकीय ध्येयधोरण, विकास कार्यक्रम, समाजकल्याणात्मक कार्यक्रम, उपक्रम, योजना यांचा प्रसार, प्रबोधन किंवा अविष्कार करण्यासाठी देण्यात आलेली दर्शनी जाहिरात.

२ - क)	'शासनमान्य वृत्तपत्र' म्हणजे शासकीय जाहिरातींच्या वितरणासाठी शासनमान्य यादीत समाविष्ट होण्यासाठीचे आवश्यक असलेले निकष पूर्ण करुन शासनमान्य यादीत समाविष्ट करण्यात आलेले वृत्तपत्र/नियतकालिक किंवा अन्य प्रकाशन.

२ - ड) 'शासनमान्य यादी' म्हणजे शासकीय जाहिरातींच्या वितरणासाठी जाहिरात यादीवर येण्यासाठीचे आवश्यक निकष पूर्ण करणाऱ्या वृत्तपत्र/नियतकालिकांची तयार करण्यात आलेली यादी.

२ - इ) 'वृत्तपत्र/नियतकालिक' म्हणजे ज्यात सार्वजनिक स्वरुपाचा वृत्तप्रधान मजकूर, बातम्या, लेख, अग्रलेख आदि मुद्रित केले जाते असे 'प्रेस अँण्ड रजिस्ट्रेशन ऑफ बुक्स ॲक्ट १८६७' (केंद्रशासनाचा १८६७ चा २५ वा कायदा) अंतर्गत नोंदणी करण्यात आलेले कोणतेही नियतकालिक प्रकाशन.

२ - ई) 'जाहिरात वितरण अधिकारी' म्हणजे महाराष्ट्र शासनाच्या माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे महासंचालक किंवा त्यांनी प्राधिकृत केलेला अधिकारी. (विभागीय माहिती उपसंचालक व जिल्हा माहिती अधिकारी)

२ - फ) 'शासनमान्य जाहिरात दर' म्हणजे शासनमान्य जाहिरातींच्या वितरणासाठी खपावर आधारित निर्धारित केलेल्या दरकोष्टकानुसार प्राप्त होणारा मूळ दर अधिक शासनाने निश्चित केलेल्या खास सुविधांसाठी निश्चित केलेला दर. हा दर प्रति कॉलम सेंटिमीटरच्या प्रमाणात संबंधित वृत्तपत्र नियतकालिकांना मंजूर करण्यात आलेला जाहिरात दर असेल.

३-अ) शासनाच्या विविध विभागांच्या सर्व वर्गीकृत जाहिरातींचे वितरण माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचे मुख्यालय, विभागीय माहिती उपसंचालक तसेच संबंधित जिल्हा माहिती अधिकाऱ्यांच्या कार्यालयामार्फत फक्त शासनमान्य यादीतील वृत्तपत्रांनाच करण्यात येईल.

वर्गीकृत जाहिरातींमध्ये निविदा सूचना, लीलाव, सेवाभरती, अधिसूचना इ.चा समावेश राहील. एखादी जाहिरात अगदीच तातडीने प्रसिद्ध करावयाची गरज निर्माण झाल्यास अपवादात्मक परिस्थितीत ती वृत्तपत्रांकडे परस्पर पाठविण्याबाबत एखाद्या शासकीय विभागास मुभा राहील. तथापि, अशा प्रसंगी त्या शासकीय विभागाने माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या संबंधित कार्यालयाकडे (मुख्यालय, विभागीय माहिती उपसंचालक, जिल्हा माहिती कार्यालय यांच्याशी) संपर्क साधून सदर जाहिरात प्रसिद्ध करण्यासाठी शासनमान्य यादीतील योग्य अशा वृत्तपत्रांची नावे जाणून घेणे आवश्यक आहे. एखाद्या शासकीय विभागाची अशी कारवाई योग्य कारणांसाठीच मान्य करण्यात येईल.

३-ब) माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडे वितरणासाठी आलेली वर्गीकृत स्वरुपाची जाहिरात 'अ' वर्ग वृत्तपत्रांना वितरित करतांना त्या त्या संबंधित विभागातील 'अ' वर्ग दैनिकाला प्रसिद्धीस देणे बंधनकारक आहे. त्याचप्रमाणे संबंधित विभागात 'अ' वर्ग दैनिक नसेल तर ती त्या विभागातील 'ब' वर्ग दैनिकास व त्या विभागात 'ब' वर्ग दैनिकही नसेल तर ती त्या विभागातील सर्वाधिक खपाच्या 'क' वर्ग दैनिकास आणि त्या विभागाच्या संलग्न

विभागातील 'अ' वर्ग वृत्तपत्रात प्रसिद्धीसाठी वितरित करण्यात यावी. 'अ' वर्गात प्रसिध्दीस देण्यात येणारी प्रत्येक जाहिरात, जाहिरातीतील काम ज्या विभाग/जिल्हयाशी संबंधित आहे त्या विभागातील/जिल्हयातील एका 'ब'व 'क' वर्ग दैनिकास आळीपाळीने त्या वर्गातील वृत्तपत्रांचे सें.मी.चे प्रमाण लक्षात घेऊन मुख्यालयामार्फत वितरित करण्यात येईल.

एखाद्या विभागात फक्त एकच 'अ' वर्ग दैनिक असल्यास त्या विभागाच्या 'अ' वर्गासाठीच्या सर्व जाहिराती त्या एकाच दैनिकास दिल्या जाण्याची शक्यता असते ही बाब वृत्तपत्रांना करावयाच्या समान प्रति कॉ.सें.मी. च्या वाटपाच्या तत्वाशी विसंगत होईल. यास्तव विभागात फक्त एकच 'अ' वर्ग दैनिक असेल तर प्रत्येक जाहिरात त्याच दैनिकास न देता रोस्टर पद्धतीने संलग्न विभागातील 'अ' वर्गीय दैनिकास देण्यात येईल. हे रोस्टर माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत ठरवून देण्यात येईल. 'अ' वर्ग दैनिकाचे जाहिरात वितरणाचे सें.मी.चे प्रमाण त्या त्या विभागातील 'अ' वर्ग दैनिकात समान स्वरुपात ठेवण्यात येईल.

४) शासनाच्या वर्गीकृत व दर्शनी अशी सर्व जाहिरातींचे वितरण फक्त माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून करण्यात येईल. त्यात अल्पबचत, महाराष्ट्र राज्य लॉटरी व कुटुंब कल्याण विभागाच्या जाहिरातींचाही समावेश आहे.

५-अ) सर्व 'अ' वर्ग वृत्तपत्रांचे वर्गीकृत जाहिरातींचे वितरण माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या मुख्यालयाकडून करण्यात येईल. तसेच मुंबई विभागातील 'ब' वर्ग व 'क' वर्ग वृत्तपत्रांचे जाहिरात वितरणही मुख्यालयाकडून करण्यात येईल.

५ - ब) मुंबई वगळून इतर विभागाचे 'ब' वर्ग वृत्तपत्रांचे वर्गीकृत जाहिरातीचे वितरण संबंधित विभागाच्या विभागीय माहिती उपसंचालकांकडून करण्यात येईल. 'ब' वर्गात प्रसिद्धीसाठी देण्यात येणारी जाहिरात त्या वर्गातील 'ब' दैनिकाबरोबरच त्या वर्गातील एका साप्ताहिकासही देण्यात येईल.

तथापि, दैनिके आणि साप्ताहिके यांच्या नियतकालिकेतील फरक लक्षात घेता 'ब' वर्गातील साप्ताहिकांना 'ब' वर्गातील दैनिकांइतक्याच आकारातील जाहिराती देणे योग्य होणार नाही हे स्पष्ट करण्यात येत आहे. यासंबसंधीचे आवश्यक ते तारतम्य उपसंचालकांनी ठेवून जाहिरातींचे वितरण करावे.

५ - क) 'क' वर्ग वृत्तपत्रांचे वर्गीकृत जाहिरातींचे वितरण संबंधित जिल्ह्याच्या जिल्हा माहिती अधिकाऱ्यांमार्फत त्या त्या जिल्ह्यातील 'क' वर्ग वृत्तपत्रांसाठी करण्यात येईल. तसेच वितरणासाठी येणारी प्रत्येक जाहिरात दैनिकाबरोबरच एका 'क' वर्ग साप्ताहिकासही देण्यात येईल.

५ - ड)    द्विसाप्ताहिकांनाही साप्ताहिकांप्रमाणेच जाहिरात वितरण करण्यात येईल.

५ - इ)    'अ', 'ब' व 'क' वर्ग वृत्तपत्रांमध्ये प्रसिध्द करावयाच्या जाहिराती अनुक्रमे मुख्यालय, विभागीय माहिती उपसंचालक व जिल्हा माहिती अधिकारी यांच्या मार्फत वितरित होतील. सर्व शासकीय कार्यालयांनी त्या त्या स्तरावर प्रसिध्द करावयाच्या जाहिराती प्रसिद्धी दिनांकापूर्वीच किमान दहा दिवस आधी संबंधित अधिका-याकडे पाठविणे बंधनकारक राहील. वृत्तपत्रनिहाय प्रसिध्द होणा-या जाहिरातीची मूल्य मर्यादा खालीलप्रमाणे राहील :

| अ.क्र. | एका कामाचे मूल्य | जाहिरात वितरण करण्याचे अधिकार | जाहिरात प्रसिध्दीचे वृत्तपत्र |
|---|---|---|---|
| १ | जाहिरातीतील ज्या एका कामाचे मूल्य रु.१५ लाखांपर्यंत आहे अशी जाहिरात | जिल्हा माहिती अधिकारी | एक 'क' वर्ग दैनिक व एक साप्ताहिक |
| २ | जाहिरातीतील ज्या एका कामाचे मूल्य रु.१५ लाखाच्यावर ते ५० लाखां पर्यंत आहे अशी जाहिरात | विभागीय माहिती उपसंचालक | एक 'ब' वर्ग दैनिक व साप्ताहिक |
| ३ | जाहिरातीतील ज्या एका कामाचे मूल्य रु.५०,००,००१ पेक्षा अधिक आहे अशी जाहिरात | मुख्यालय | १) संबंधित विभागातील 'अ' वर्ग दैनिकास व त्या विभागातील 'ब' व ज्या जिल्हयाचे काम असेल त्या जिल्हयातील एका 'क' वर्ग दैनिकास आळीपाळीने त्या वर्गातील वृत्तपत्रांचे सें.मी.चे प्रमाण लक्षात घेऊन जाहिरातींचे वितरण करण्यात येईल. |

५ - इ)    हे जाहिरातीचे वर्गीकरण स्थापत्य स्वरुपाच्या बांधकामांना लागू आहे.

५ - ई)    इतर प्रकारच्या जाहिराती संबंधित विभागाने सुचविलेल्या वर्गांना प्राधान्य देऊन वितरित करण्यात याव्यात. या जाहिरातींच्या वितरणाचे अधिकार त्या त्या विभागातील विभागीय उपसंचालक यांना राहतील.

५ - प)    मात्र मुंबई विभागातील अ, ब व क वर्ग वृत्तपत्रांसाठी अशा जाहिरातींचे वितरण मुख्यालयाच्या जाहिरात शाखेमार्फत करण्यात येईल.

५ - फ)    वृत्तपत्र कोणत्या भाषेचे असावे याबद्दल संबधित विभागाची शिफारस लक्षात घेतली जाईल.

६) शासनाची विविध मंडळे, महामंडळे, जिल्हा परिषदा, महानगरपालिका, नगरपरिषदा, शासन पुरस्कृत सहकारी संस्था आदि स्वायत्त संस्थांच्या वर्गीकृत जाहिराती तसेच दर्शनी जाहिराती शासन धोरणाप्रमाणे वृत्तपत्रांना परस्पर वितरित करण्याचे अधिकार या संस्थांना आहेत. तथापि, त्यांनी आपल्या जाहिरातीच्या वितरणासाठी शासनमान्य वृत्तपत्रांच्या यादीचा तसेच शासनमान्य दराचा अंगीकार करुन शासन धोरणाप्रमाणे त्या त्या वर्गातील वृत्तपत्रांमध्ये करावयाच्या समान तत्वावरील वाटपाच्या धोरणाचा कटाक्षाने अंमल करावा. महासंचालक, माहिती व जनसंपर्क सर्व संबंधितांना अंमलबजावणीची प्रक्रिया व नियमावली निश्चित करुन देतील.

७) शासनमान्य यादीतील वृत्तपत्रांना वर्गीकृत जाहिरातीचे वितरण माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून व त्यांच्या नियंत्रणाखालील विभागीय व जिल्हा माहिती कार्यालयाकडून करतांना असे वाटप त्या त्या वर्गातील वृत्तपत्रांमध्ये समान प्रति कॉलम सेंटिमीटरच्या तत्वावर करण्यात यावे. कोणत्याही एका वृत्तपत्राला किंवा वृत्तपत्राच्या एका गटाला वर्गीकृत जाहिरातीच्या वितरणाबाबतीत विशेष प्राधान्य दिले जाणार नाही.

८) वृत्तपत्रांना वितरित करण्यात आलेल्या जाहिरातींची नोंद ठेवता येणे शक्य व्हावे म्हणून वृत्तपत्रांना दिलेल्या प्रत्येक जाहिरातीच्या वितरण आदेशाच्या मूळ प्रतीची नोंद माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या संबंधित कार्यालयाकडे ठेवणे बंधनकारक राहील. त्याचप्रमाणे त्या जाहिरातीच्या देयकाची तिसरी प्रत माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या संबंधित कार्यालयाकडे पाठविणे प्रत्येक वृत्तपत्राला बंधनकारक राहील.

ज्या शासकीय विभागाची जाहिरात असेल त्या शासकीय कार्यालयाकडे त्या जाहिरातीची देयके चुकती करण्यासाठी पाठवितांना त्या देयकावर ''तिसरी प्रत माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या संबंधित कार्यालयाकडे पाठविण्यात आली आहे'' अशी नोंद घेणे आवश्यक राहील. ज्या देयकावर अशी नोंद नसेल त्या देयकाची रक्कम संबंधित शासकीय कार्यालयाकडून चुकती करण्यात येणार नाही.

जी वृत्तपत्रे देयकाची अशी तिसरी प्रत माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या संबंधित जाहिरात वितरण करणाऱ्या कार्यालयात पाठविणार नाहीत त्यांच्या जाहिराती स्थगित करण्यात येतील व हे अधिकार त्या वृत्तपत्रांना जाहिरात वितरण करणा-या अधिका-यास असतील.

९) शासनमान्य यादीत वृत्तपत्रांचा समावेश करणे, निकष पूर्ण न करणाऱ्या वृत्तपत्राचे नांव यादीवरुन कमी करणे, जिल्हा माहिती अधिकाऱ्यांनी दर दोन वर्षांनी शासनमान्य यादीतील वृत्तपत्रांची सर्व निकषांच्या संबंधात फेरपडताळणी केल्यानंतर प्राप्त अहवालानुसार शासनमान्य यादीचे नुतनीकरण करण्याचा निर्णय घेण्यासाठी तसेच दरवाढ व श्रेणीवाढीच्या अर्जांवर विचार करण्यासाठी नियुक्त समितीची रचना खालीलप्रमाणे राहील.

९ - अ)

१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क .. अध्यक्ष
२. उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग .. सदस्य
३. संचालक (माहिती) .. सदस्य
४. अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने .. सदस्य
५. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या मुख्यालयातील जाहिरात शाखेचे नियंत्रक अधिकारी .. सदस्य सचिव

९ - ब) या समितीच्या बैठका वर्षातून दोनदा म्हणजे 'सप्टेंबर' व 'मार्च' महिन्यात घेण्यात येतील. पहिल्या वर्षीच्या सप्टेंबर महिन्याच्या बैठकीत फक्त नव्याने शासनमान्य यादीत समाविष्ट होण्याची मागणी असणाऱ्या अर्जांचाच विचार करण्यात येईल. तसेच मार्च महिन्यात होणाऱ्या दुसऱ्या बैठकीत शासनमान्य यादीतील वृत्तपत्रांच्या दरवाढ, श्रेणीवाढीच्या अर्जांवरील निर्णय घेण्यात येऊन त्याबाबतची मंजूरी प्रदान करण्यात येईल. तसेच दुसऱ्या वर्षीच्या सप्टेंबर महिन्याच्या प्रथम बैठकीत वृत्तपत्रांचा नव्याने शासनमान्य यादीत समाविष्ट करण्याबाबतच्या अर्जांचा विचार करण्यात येईल. तर दुसऱ्या वर्षीच्या मार्च महिन्याच्या बैठकीत जिल्हा माहिती अधिकारी यांनी दर दोन वर्षांनी वृत्तपत्रांची सर्व निकषांच्या संबंधात फेरपडताळणी केल्यानंतर प्राप्त अहवालानुसार शासनमान्य यादीचे नूतनीकरण करण्यात येईल.

९ - क) वृत्तपत्रांची दर दोन वर्षांनी फेरपडताळणी केल्यानंतर जिल्हा माहिती अधिकारी यांनी सादर केलेल्या अहवालाप्रमाणे निकषांना पात्र ठरणाऱ्या वृत्तपत्रांची नव्याने शासनमान्य यादी तयार करण्यात येईल व त्यास मार्च महिन्याच्या बैठकीत मान्यता घेण्यात येईल. तसेच जी वृत्तपत्रे या फेर पडताळणीनंतर निकषांना पात्र ठरणार नाहीत व ती शासनमान्य यादीतून बाद होतील. अशा वृत्तपत्रांची माहिती त्यांच्या नावासह व वस्तुनिष्ठ कारणासह माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत जाहीर करण्यात येईल.

९ - ड) जिल्हा माहिती अधिका-यांच्या अहवालासोबत वृत्तपत्रांकडून आर.एन.आय. ला पाठविण्यात येणा-या वार्षिक अहवालाची (Annual Statement ) एक प्रत जोडणे आवश्यक आहे ती जिल्हा माहिती अधिकारी यांनी संबंधित वृत्तपत्रांकडून मागवून घेऊन आपल्या अहवालासोबत पाठवावी.

९ - ई) जाहिरात स्थायी समितीच्या बैठकांना ज्यांच्या विभागातील वृत्तपत्रे/नियतकालिके समितीपुढे विचारार्थ असतील अशा संबंधित विभागाच्या माहिती संचालक व उपसंचालकांना संबंधित वृत्तपत्रांबाबतचे आपले अभिप्राय नोंदविण्यासाठी हजर राहण्यास सांगण्यात येईल.

९ - प)  शासनमान्य यादीतील वृत्तपत्रे दोन वर्षासाठी शासनमान्य यादीत राहतील. जिल्हा माहिती अधिकारी, त्यांच्या जिल्ह्यातील शासनमान्य यादीत समाविष्ट असलेल्या वृत्तपत्रांबाबतचा फेरतपासणीबाबतचा विहित नमुन्यातील अर्ज भरुन तो विभागीय माहिती उपसंचालक यांच्याकडे पाठवतील विभागीय स्तरावरील बैठकीत या सर्व अहवालांचे अवलोकन केल्यानंतर हे सर्व अहवाल विभागीय माहिती उपसंचालक अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने कार्यालयात पाठवतील. अधिपरीक्षकांनी सर्व जिल्हा माहिती अधिकाऱ्यांकडून प्राप्त होणारे असे विहित नमुन्यातील अर्ज स्थायी समितीच्या बैठकीपुढे (मार्च महिना) विचारार्थ ठेवावेत.

मुंबई व उपनगर क्षेत्रातील शासनमान्य यादीतील वृत्तपत्रांच्या प्रतीवर्षाच्या फेरतपासणीचे काम अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने विभागामार्फत केले जाईल. शासनाने परिशिष्ट 'क' मध्ये दिलेल्या विहित नमुन्यातील प्रमाणपत्रात अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने यांनी हा अहवाल तयार करुन तो इतर विभागांच्या अहवालासोबतच स्थायी समितीच्या बैठकीत विचारार्थ ठेवावा.

अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने विभागाने शासनमान्य यादीतील वृत्तपत्रांच्या नियमिततेचा व दर्जाबाबतचा अहवाल विहित नमुन्यात तयार करुन तो सर्व विभागीय माहिती उपसंचालक यांनी त्यांच्या विभागातील वृत्तपत्रांच्या पाठविलेल्या अहवालासोबतच स्थायी समितीच्या बैठकीत सादर करावा. शासनमान्य यादीतील वृत्तपत्राबाबत जिल्हा माहिती अधिकाऱ्यांच्या फेरपडताळणी अहवाल व अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने विभागामार्फत देण्यात आलेला अहवाल, अशा दोन्ही अहवालांचे अवलोकन केल्यानंतर निकषांना पात्र ठरणाऱ्या वृत्तपत्रांची नव्याने शासनमान्य यादी महासंचालनालय स्तरावरच तयार करण्यात येईल.  निकषास पात्र न ठरणाऱ्या वृत्तपत्रांना शासनमान्य यादीतून वगळण्यात येईल.

९ - फ)  नव्याने शासनमान्य यादीत समाविष्ट होणाऱ्या, दरवाढ व श्रेणीवाढीची मागणी असणाऱ्या वृत्तपत्रांचे अर्ज संबंधितांनी, त्यांच्या विभागीय माहिती उपसंचालकांमार्फत फक्त अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने विभागाकडे पाठविणे आवश्यक आहे. सदर अर्जाचा नमुना परिशिष्ट 'ब' मध्ये देण्यात आलेला आहे. हे अर्ज प्रत्येक जिल्ह्याच्या जिल्हा माहिती कार्यालयात उपलब्ध असतील.

९ - ग)  शासनमान्य यादीत समाविष्ट होण्यासाठी दरवाढ व श्रेणीवाढ यांच्या मागणीसाठी केलेल्या विहीत नमुन्यातील अर्जात (परिशिष्ट ब) वृत्तपत्रांची यंत्रसामुग्री खपाबाबतचे अधिकृत प्रमाणपत्र, कागदखरेदी आणि प्रत्यक्ष कागदाचा वापर, छपाई आदेश, वाहतूक, खर्च, अभिकर्त्यांची देयके, वर्गणीदारांच्या पावत्या, अंक वितरणाचा तपशील, वाहतूकीची देयके इ. तपशील भरुन देणे आवश्यक राहील.

९ - ह) फेरतपासणी, दरवाढ, श्रेणीवाढ व नव्याने शासनमान्य यादीत समाविष्ट होणाऱ्या वृत्तपत्रांच्या मुद्रणालयास प्रत्यक्ष भेट देऊन या सर्व बाबींची वस्तुस्थिती पाहिली जाईल. नव्याने शासनमान्य यादीत समाविष्ट होणाऱ्या, दरवाढ व श्रेणीवाढीची मागणी असलेल्या वृत्तपत्रांची पडताळणी अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने विभाग व संबंधित जिल्ह्याचे जिल्हा माहिती अधिकारी अशी संयुक्तरित्या करण्यात येईल. तर शासनमान्य यादीतील वृत्तपत्रांची फेरतपासणी जिल्हा माहिती अधिकारी यांनी सादर केलेल्या विहीत नमुन्यातील प्रमाणपत्रावरुन करण्यात येऊन दर दोन वर्षांनी शासनमान्य वृत्तपत्रांच्या यादीचे नुतनीकरण करण्यात येईल. ज्या वृत्तपत्रांची नावे या यादीत प्रतिवर्षी नामंजूर होतील त्यांना त्यांचा निर्णय कारणासह अधिपरीक्षकांच्या स्वाक्षरीने कळविण्यात येईल व ज्या वृत्तपत्रांची नावे शासनमान्य यादीत शासनाच्या सामान्य प्रशासन विभागाच्या मंजुरीनंतर समाविष्ट करण्यात येतील त्यांची मान्यता व मंजूर दर याची सुचना त्यांना अधिपरीक्षकांमार्फत देण्यात येईल.

१०. शासनमान्य यादीत समाविष्ट होण्यासाठी निकष व अटी -

१० - अ) प्रथम प्रकाशनाच्या तारखेपासून सहा महिन्यांच्या कालावधीत अखंड व नियमित प्रकाशित होणाऱ्या वृत्तपत्रांचाच शासनमान्य यादीत समावेश करण्यासाठी विचार करण्यात येईल. वृत्तपत्रांना संलग्न विभाग किंवा संलग्न जिल्ह्याची मान्यता दिली जाणार नाही. एखाद्या वृत्तपत्राची आवृत्ती शासनमान्य यादीवर घ्यावयाची असेल तर त्या आवृत्तीच्या ठिकाणी आवश्यक तेवढे कर्मचारी असावेत व ती आवृत्ती तिथेच छापली जाणे अनिवार्य आहे. आवृत्तीच्या ठिकाणी सर्व सुविधांसह परिपूर्ण स्वतंत्र कार्यालय असणे आवश्यक असून त्या आवृत्तीत त्या भागातील बातम्यांचे प्रमाण मोठयाप्रमाणात असणे आवश्यक आहे. असे असल्यास त्या वृत्तपत्राच्या अन्य आवृत्तीच्या सतत पाच महिन्यांच्या अखंडित, नियमित प्रकाशनानंतर, सर्व निकषांना पात्र ठरल्यास शासनमान्य यादीत समाविष्ट करण्याबाबत विचार करता येईल.

१० - ब) शासनमान्य यादीत समाविष्ट होताना त्या संबंधित वृत्तपत्राचे मनुष्यबळ, कायम कर्मचारी, सेवक वर्ग, वृत्तपत्रांमध्ये विकास कार्याला दिली जाणारी प्रसिद्धी, वेतन आयोगाप्रमाणे वेतन दिल्या जाणाऱ्या कर्मचाऱ्यांची संख्या लक्षात घेतली जाईल.

१० - क) तालुका व त्याखालील स्तरावरुन प्रसिद्ध होणाऱ्या ज्या दैनिकाचा किमान खप २००१ प्रती एवढा आहे, विभागीय मुख्यालयाच्या ठिकाणाहून प्रसिद्ध होणाऱ्या ज्या दैनिकाचा किमान खप ३००१ प्रतींएवढा आहे व मुंबई येथून प्रसिद्ध होणाऱ्या ज्या दैनिकांचा किमान खप ५००१ प्रतींएवढा आहे त्यांचाच शासनमान्य यादीत 'क' वर्गात समावेश करण्यासाठी विचार करता येईल.

१० - ड) ज्या साप्ताहिकांचा किमान खप १००१ प्रतींएवढा आहे त्यांचा समावेश 'क' वर्गात करण्यात येऊन त्यांना शासनाच्या वर्गीकृत जाहिरातींचे वितरण करण्यात येईल.

१० - इ) शासनमान्य यादीत नसलेल्या दैनिकांना व साप्ताहिकांना एका आर्थिक वर्षात शासनाच्या दहा दर्शनी जाहिरातींचे वितरण करण्यात येईल.

१० - ई) पाक्षिके, मासिके, त्रैमासिके, वार्षिके, स्मरणिका व इतर नियतकालिके यांचा विचार फक्त शासनाच्या दर्शनी जाहिरातींसाठी करण्यात येईल.

११. खपाची पडताळणी :

११ - अ) शासनमान्य यादीत समाविष्ट होण्यासाठी, शासनमान्य यादीतील आपली श्रेणी वाढवून घेण्यासाठी, दरवाढीसाठी अर्ज करणाऱ्या वृत्तपत्रांपैकी 'अ' वर्ग वृत्तपत्राला 'ऑडिट ब्युरो ऑफ सर्क्युलेशन' या संस्थेचे सभासद असणे बंधनकारक आहे. त्यांनी आपल्या वृत्तपत्राचा खप या संस्थेच्या प्रमाणपत्राप्रमाणे दर दोन वर्षांनी सादर करणे आवश्यक आहे.

११ - ब) ए.बी.सी. प्रमाणपत्र धारण करणाऱ्या 'अ', 'ब' व 'क' वर्ग वृत्तपत्रांना त्यांच्या मूळ दराच्या (ए.बी.सी. प्रमाणपत्रधारक वृत्तपत्रांचा मूळ दर) २५ टक्के अधिक दर देऊन त्यांचा दर निश्चित केला जाईल.

११ - क) ज्या 'ब' व 'क' वर्ग वृत्तपत्राकडे ए.बी.सी. प्रमाणपत्र नसेल अशा वृत्तपत्रांनी आपल्या खपाबाबत शासनाने विहित केलेल्या नमुन्यामध्येच सनदी लेखापालाचे (चार्टर्ड अकाउंटंट) प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील. या प्रमाणपत्राचा विहित नमुना परिशिष्ट 'क' मध्ये देण्यात आला आहे.

११ - ड) खपाच्या पडताळणीबाबत सध्या अस्तित्वात असलेली अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने कार्यालयातील यंत्रणा अधिक व्यापक व शास्त्रशुद्ध करण्यात येईल. या परीक्षकांना व माहिती खात्यातील अधिका-यांना राज्यातील कोणत्याही वृत्तपत्र/नियतकालिकाच्या मुद्रण व प्रकाशन स्थळास भेट देऊन छपाई यंत्राची क्षमता, कागदाचा वापर खरेदी, कायम कर्मचाऱ्यांची संख्या, पोष्टाचे प्रमाणपत्र, एस.टी./रेल्वेने वृत्तपत्रांच्या एकूण अंकांच्या संख्येसह पाठविले जाणारे वृत्तपत्रांचे गठ्ठे, छपाई आदेश, बिले, त्याच्या पावत्या, वर्गणीदार असल्यास त्यांची यादी, पावत्या, वितरणासंबंधीची वाहतूकीची बिले आदी तपशीलाची माहिती घेण्याचे व त्याआधारे संबंधित वृत्तपत्राच्या खपाचे आकडे तपासण्याचे अधिकार राहतील.

११ - ई) वृत्तपत्र/नियतकालिकाच्या खपाचे पडताळणीचे काम हे नित्याचे काम म्हणून अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने विभाग व संबंधित जिल्ह्याचे जिल्हा माहिती अधिकारी यांच्यामार्फत संयुक्तरित्या करण्यात येईल. प्रसंगी एखाद्या वृत्तपत्र/नियतकालिकाची खपाबाबत व इतर निकषांबाबत एका वर्षात एकाहून अधिकवेळा तपासणी करता येऊ शकेल.

१२. प्रकाशनातील नियमितपणा :

१२ - अ) शासनाच्या प्रशासकीय कार्यात सुलभता यावी यासाठी दैनिके व साप्ताहिके यांच्याबाबतीत प्रचलित असलेले 'राज्यस्तर, विभागस्तर व जिल्हास्तर' हे नामाभिधान रद्द करण्यात येऊन फक्त 'अ' वर्ग वृत्तपत्रे, 'ब' वर्ग वृत्तपत्रे, 'क' वर्ग वृत्तपत्रे असे नामाभिधान निश्चित करण्यात येत आहे.

१२ - ब) शासनमान्य यादीतील वृत्तपत्र/नियतकालिकांचे अंक त्यांच्या ठराविक नियत तारखांनाच प्रसिद्ध होणे आवश्यक आहे. तथापि, जर खालीलप्रमाणे अंकाचे प्रकाशन झाले असेल तर ते प्रकाशन नियमित आहे असे मानण्यात येईल.

१. दैनिकाच्या बाबतीत वर्षातून किमान ३०० अंक

२. सांय दैनिकांच्या बाबतीत वर्षातून किमान २५० अंक

३. साप्ताहिकांच्या बाबतीत वर्षातून किमान ४० अंक

४. अर्धसाप्ताहिक /द्विसाप्ताहिकाच्या बाबतीत वर्षातून किमान ८० अंक

१२ - क) कोणतेही प्रकाशन खालील परिस्थितीत अनियमित आहे असे मानण्यात येईल.

(अ) दैनिके व सांज दैनिके : ज्याचे प्रकाशन सतत एक आठवड्यासाठी बंद असेल.

(ब) साप्ताहिके : ज्याचे प्रकाशन सतत तीन आठवडे बंद असेल.

(क) पाक्षिके : ज्याचे प्रकाशन सतत एक महिन्याकरिता बंद असेल.

(ड) मासिके : ज्याचे प्रकाशन सतत दोन महिने बंद असेल.

मात्र, यांत्रिक बिघाडामुळे किंवा औद्योगिक कलहामुळे किंवा मानवी नियंत्रणाबाहेरील अन्य कारणांमुळे जर एखाद्या वृत्तपत्राच्या/नियतकालिकाच्या प्रकाशनात खंड पडला तर त्यामुळे त्याचे प्रकाशन अनियमित आहे असे मानले जाणार नाही. मात्र अशा कारणांबाबत जिल्हा माहिती अधिकाऱ्यांकडे तसेच अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने कार्यालयाकडे वृत्तपत्राच्या अनियमितपणाबद्दलची माहिती त्वरित कळविणे आवश्यक राहील.

१२ - ड) शासनमान्य यादीतील दैनिकांना त्यांचे प्रसिध्द होणारे दोन अंक संबंधित जिल्हा माहिती अधिकारी यांच्या कार्यालयात दररोज पाठविणे बंधनकारक राहील.मुंबई विभागातील दैनिकांनी असे प्रसिध्द होणारे दोन अंक अधिपरीक्षक कार्यालयात दररोज पाठवावेत.

साप्ताहिकांच्या संपादकांनी प्रकाशन तिथीनंतर प्रसिद्ध होणाऱ्या अंकाच्या दोन प्रती संबंधित जिल्ह्याच्या जिल्हा माहिती कार्यालयात व अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने कार्यालयास तात्काळ पाठविणे बंधनकारक राहील. मुंबई विभागातील साप्ताहिकाच्या संपादकांनी प्रसिद्ध होणारा अंक प्रसिद्धी तारखेनंतर तात्काळ अधिपरीक्षक, पुस्तके व प्रकाशने कार्यालयाकडे पाठविणे बंधनकारक राहील.

१२ - ई) प्रकाशनातील अनियमितपणा, वृत्तपत्राचा दर्जा किंवा इतर आवश्यक निकषांची पूर्तता न करणाऱ्या, जाहिरात प्रसिद्धीमध्ये शासनाची दिशाभूल करणाऱ्या वृत्तपत्रांना

शासनमान्य यादीवरुन कायमचे किंवा काही कालावधीसाठी वगळण्याचे अधिकार महासंचालक, माहिती व जनसंपर्क यांना असतील. मात्र अशी कार्यवाही करण्यापूर्वी महासंचालकांनी संबंधित वृत्तपत्राच्या व्यवस्थापनाला आपली बाजू मांडण्याची संधी द्यावी.

१२ - प) शासनमान्य यादीत समाविष्ट असलेल्या वृत्तपत्र/नियतकालिकांनी नियम १३ मधील पृष्ठसंख्या किंवा आकार कमी केल्यास किंवा त्यासंबंधीतील तरतूदीचा सतत एक महिन्याच्या काळाकरिता भंग केल्यास अशा वृत्तपत्रांना शासनमान्य यादीतून वगळण्याचे अधिकार महासंचालक, माहिती व जनसंपर्क यांना असतील.

१३. वृत्तपत्राचा आकार व पृष्ठसंख्या

१. दैनिके : ४७.५० सें.मी. x ३७ सें.मी. आकारातील प्रत्येक पृष्ठावर किमान ७ कॉलम मजकूर असलेली किमान चार पृष्ठे असल्यास त्यास 'दैनिक' म्हणून मान्यता देण्यात येईल.

२. ट्यॅब्युलाईड आकारातील दैनिके : ३६ सें.मी. x २३ सें.मी. आकारातील क्राऊन साईजमध्ये प्रकाशित होणारे वृत्तपत्र दैनिक स्वरुपात प्रकाशित होत असेल आणि त्याची पृष्ठसंख्या किमान ८ पृष्ठे असेल अशा दैनिकाचा मजकूर १२०० कॉ.सें.मी. असेल तरच त्याला 'दैनिक' म्हणून मान्यता देण्यात येईल व त्यास पूर्ण दर देण्यात येईल.

३. उपरोक्त नमूद केलेल्या आकार व पृष्ठसंख्या नसलेल्या वृत्तपत्रांना शासनमान्य यादीत समाविष्ट करण्यासाठी 'दैनिक' म्हणून मान्यता दिली जाणार नाही.

४. साप्ताहिके : ३६ सें.मी. x २३ सें.मी. आकारातील प्रत्येक पृष्ठावर किमान ४ कॉलम असलेली ४ पृष्ठे, एकूण मजकूर किमान ५४० कॉ.सें.मी. असल्यास त्या प्रकाशनास साप्ताहिक म्हणून मान्यता देता येईल.

५. सांयदैनिके : ५४० कॉ.सें.मी. मजकूर असलेल्या दैनिकाची पृष्ठ संख्या किमान चार असल्यास त्यास सायं दैनिक म्हणून मान्यता देण्यात येऊन त्यास दैनिकाच्या ७५ टक्के दर देण्यात येईल.

६. मजकुराचे प्रमाण : वृत्त/टिप्पणी/बातम्या यास एकूण मजकूर ६० टक्के व जाहिरातीचा मजकूर ४० टक्के असावा. दैनिकांबाबतीत याची मासिक सरासरी पाहिली जाईल. साप्ताहिकांबाबत ही सरासरी तीन महिन्यांची पाहिली जाईल.

१४. वृत्तपत्रांचा दर्जा

१४ - अ) वापरण्यात येणाऱ्या वृत्तपत्राची कागदाची प्रतवारी, छपाईपद्धत, मुद्रण यंत्रसामुग्री, विविध सेवांचा वापर इ. गोष्टी, वृत्तपत्रांचा दर्जा निश्चित करतांना लक्षात घेतल्या जातील.

१४ - ब) राष्ट्रीय ऐक्य, राष्ट्रीय सुरक्षा, सामाजिक ऐक्य, कायदा व सुव्यवस्थेस बाधक ठरणाऱ्या, जातीजातीत तेढ निर्माण होईल असे द्वेषमूलक लिखाण करणाऱ्या, वृत्तपत्रीय

आचार संहितेचा भंग करणाऱ्या वृत्तपत्रांच्या जाहिराती कांही काळाकरिता किंवा कायमच्या बंद करण्याचा अधिकार शासनास आहे. शासनाचे हे धोरण स्पष्टच असल्यामुळे या कार्यवाहीसाठी उचित कार्यवाहीपूर्व नोटीस देण्याची आवश्यकता राहणार नाही.

१४ - क) समान मजकूर केवळ वृत्तपत्राचे नाव बदलून किंवा प्रकाशनाची तारीख बदलून छापत असल्याचे आढळल्यास शासनमान्य यादीत समाविष्ट असलेल्या अशा एखाद्या वृत्तपत्राचे जाहिरात वितरण स्थगित करण्याची कार्यवाही (प्रकाशनाच्या अनियमितपणाच्या कारणामुळे करावयाच्या कार्यवाहीप्रमाणेच) माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून करण्यात येईल. जी वृत्तपत्रे अशा पध्दतीने प्रसिध्द होत असतील अशा वृत्तपत्रांना देण्यात आलेल्या जाहीरातींची देयके अदा करण्यात येऊ नयेत असे संबंधित शासकीय कार्यालयास कळविण्यात येईल.

१४ - ड) एकाच कुटुंबाच्या मालकीची एकाच जिल्ह्यातील जास्तीत जास्त दोन वृत्तपत्रे शासनमान्य यादीत घेता येतील.

१४ - ई) दैनिकाबरोबर त्याच नावाचे, त्याच प्रकाशन संस्थेचे साप्ताहिक जाहिरात यादीवर असल्यास इतर दैनिकाच्या तुलनेत जास्तीत जास्त जाहिराती मिळविण्याची शक्यता लक्षात घेता अशा संबंधित साप्ताहिकाचे प्रकाशन दैनिकांच्या सात दिवसांच्या प्रकाशनाच्या व्यतिरिक्त स्वतंत्रपणे होणे आवश्यक आहे. अन्यथा दैनिकाचे सहा दिवसांचे अंक दैनिक म्हणून व_सातव्या दिवशीचा अंक साप्ताहिक म्हणून प्रकाशित केला जात असल्यास किंवा त्या तारखेस दैनिक व साप्ताहिकाचा अधिकांश मजकूर केवळ वृत्तपत्राचे नाव बदलून किंवा तोच मजकूर अंक प्रकाशनाची तारीख बदलून छापला जात असेल तर अशा साप्ताहिकास शासनमान्य यादीतून वगळण्यात येईल.

१४ - प) दैनिकाच्या प्रत्येक अंकात अग्रलेख असणे आवश्यक आहे. साप्ताहिकांसाठी हे प्रमाण महिन्यातून दोनदा व वर्षात २० वेळा असे असणे आवश्यक आहे.

१५) वर्गनिहाय खपाचे निकष खालीलप्रमाणे असावेत.

१५ - अ) दैनिके:

| अ,क्र | वृत्तपत्राचा वर्ग | किमान व कमाल खपाचा निकपक |
|---|---|---|
| १ | क वर्ग दैनिके | (१) जिल्हा व त्याखालील स्तरावरुन प्रसिध्द होणा-या दैनिकांसाठी किमान खप २००१ ते २०,००० प्रतीं एवढा असणे आवश्यक.<br>(२) विभागीय मुख्यालयांच्या ठिकाणांहून प्रसिध्द होणा-या दैनिकांसाठी किमान खप ३००१ ते २०,००० प्रतीं एवढा असणे आवश्यक.<br>(३) मुंबईतून प्रसिध्द होणा-या दैनिकांसाठी किमान खप ५००१ ते २०,००० प्रतीं एवढा असणे आवश्यक |

| | | |
|---|---|---|
| २ | ब वर्ग दैनिके | ब वर्ग दैनिके किमान खप २०,००१ ते ५०,००० प्रतीं एवढा असणे आवश्यक आहे. |
| ३ | अ वर्ग दैनिके | अ वर्ग दैनिके किमान खप ५०,००१ प्रतीं पेक्षा अधिक |

१४ - ब) साप्ताहिके:

| | | |
|---|---|---|
| १ | क वर्ग साप्ताहिके | किमान खप १००१ ते १०,००० प्रतीं एवढा आवश्यक |
| २ | ब वर्ग साप्ताहिके | किमान खप १०,००१ ते २५,००० प्रतीं एवढा असणे आवश्यक. |
| ३ | अ वर्ग साप्ताहिके | किमान खप २५,००१ प्रतीं पेक्षा अधिक असणे आवश्यक. |

१६. जाहिरात दराची आकारणी :

१६ - अ) वृत्तपत्र/नियतकालिकाचे जाहिरात दर १९९० च्या मूळ दराच्या १०० टक्के वाढवून देण्यात यावेत. हे दर परिशिष्ट 'अ' मधील दरकोष्टकाप्रमाणे निश्चित करण्यात यावेत.

१६ - ब) शासनमान्य यादीत समाविष्ट असलेल्या वृत्तपत्रांना/नियतकालिकांना वर्गीकृत जाहिरातींचे वितरण शासनमान्य दराप्रमाणे करण्यात येईल.

१६ - क) शासनमान्य यादीतील सर्व वृत्तपत्रांना एका आर्थिक वर्षात १ मे, १५ ऑगस्ट, २६ जानेवारी आणि दिवाळी या चार प्रसंगासह आणखी तीन ऐच्छिक प्रसंगी अशा एकूण सात दर्शनी जाहिरातींचे शासनमान्य दराने वितरण करण्यात येईल.

१६ - ड) शासनमान्य यादीत समाविष्ट नसलेल्या दैनिकांना व साप्ताहिकांना एका आर्थिक वर्षात शासनाच्या उपरोक्त प्रसंगी चार दर्शनी जाहिरातींबरोबरच अन्य सहा अशा एकूण दहा दर्शनी जाहिराती देता येतील. पाक्षिके, मासिके, त्रैमासिके, अर्धवार्षिके, वार्षिके यासारख्या नियतकालिकांना एका आर्थिक वर्षात शासनाच्या चार दर्शनी जाहिरातींचे वितरण करण्यात येईल. अशा जाहिराती देतांना त्या वृत्तपत्र/नियतकालिकांच्या किमान ५०० प्रती छापणे आवश्यक असून अशा अंकांचा किमान खप आणि दर्जा लक्षात घेऊनच दर्शनी जाहिरातींचे वितरण केले जाईल.

१६ - इ) विशेपांकासाठी दर्शनी जाहिराती व खास प्रयोजनाची निश्चिती

१. नववर्प दिन (१जानेवारी)
२. गणराज्य दिन (२६ जानेवारी)
३. महाराष्ट्र दिन (१मे)
४. स्वातंत्र्य दिन (१५ ऑगस्ट)
५. वृत्तपत्राचा वर्धापन दिन
६. पत्रकार दिन
७. राष्ट्रीय नेते, समाजसुधारक, धार्मिक नेते, नामवंत साहित्यिक, कलाकार,यांच्या जयंत्या, पुण्यतिथ्या, महानिर्वाणदिन, पष्ठयब्दी, अमृतमहोत्सव, शतकमहोत्सव असे महत्वाचे दिवस.
८. शिक्षक दिन, कुटुंवकल्याण पंधरवडा, वनमहोत्सव, पर्यावरणदिन, युएन दिवस,मानवीहक्क दिन, जागतिक आरोग्य दिन, अल्पवचत पंधरवडा, जागतिक वचत दिन यासारखे मानवी मुल्यांशी व विकास विपयांशी संवंधित दिवस.
९. गुढीपाडवा, दसरा, कालीउत्सव, दिवाळी, जन्माप्टमी, गणपती उत्सव, रामनवमी, ईद, मोहरम, पारशी वनवर्पदिन, वैसाखी, पोंगल, ओणम, ख्रिसमस असे विविध सण व प्रसंग.
१०. विशेप सभा - संमेलने मेळावे इत्यादी.

१६ - ई) वृत्तपत्रांची शासकीय जाहिरातीची देयके प्रसिद्धी तारखेनंतर ६० दिवसांच्या आत अदा करणे संवंधित शासकीय कार्यालयांस वंधनकारक राहील. वृत्तपत्रांना प्रसिध्दीसाठी वितरित करण्यात आलेल्या जाहिरात आदेशात नमूद करण्यात आलेल्या आकारापेक्षा अधिक आकारात वृत्तपत्रांनी जाहिरात प्रसिध्द केल्यास संवंधित शासकीय कार्यालयाने शासनाने ठरवून दिलेल्या आकाराचेच देयक अदा करण्यात यावे.

१६ - प) मा.महासंचालक, माहिती व जनसंपर्क यांना रुपये २०००/- मूल्यापर्यंतची जाहिरात मंजूर करण्याचे अधिकार राहतील तसेच मा.राज्यमंत्री (मा.व ज.सं.) यांना रुपये ५०००/- मूल्यापर्यंत तर रुपये १०,०००/- मूल्यापर्यंतचे जाहिरात मंजुरीचे अधिकार मा.मंत्री माहिती व जनसंपर्क यांना राहतील. त्याहून अधिक मूल्याची मागणी असलेले जाहिरातीचे प्रस्ताव शासन मंजुरीसाठी पाठवून त्यास शासन मंजूरी मिळविणे आवश्यक राहील.

१६ -फ) शासनमान्य यादीतील तसेच शासनमान्य यादीत समाविष्ट नसलेल्या वृत्तपत्र/नियतकालिकांना विशेपांकासाठी शासनाची दर्शनी जाहिरात देतांना सदर वृत्तपत्राचा तो विशेपांक नेहमीच्या पृष्ठसंख्येपेक्षा अधिक पृष्ठसंख्येने प्रसिद्ध होणे आवश्यक आहे.

१६ -ग) संबंधित वृत्तपत्राचा मूळ दर अधिक खास बाबींसाठी मंजूर करण्यात आलेला दर मिळून येणारी रक्कम अपूर्णांकात असल्यास ती अलिकडच्या किंवा पुढील लगतच्या पूर्णांकात परिवर्तीत करण्यात यावी. उदा. एखाद्या वृत्तपत्राचा दर रुपये २२.४५ पै. झाल्यास तो रुपये २२ एवढा अलिकडच्या पूर्णांकात परिवर्तीत करण्यात यावा व तो जर रुपये २२.५० एवढा झाला असल्यास तो रुपये २३.०० असा पुढील लगतच्या पूर्णांकात परिवर्तीत करण्यात येईल.

१७. विविध भाषांमधील वृत्तपत्राची ध्येयधोरणे, लिखाणाचा कल व त्यांना द्यावयाच्या जाहिरातींबाबतचे धोरण लक्षात घेण्याची व्यवस्था :

१७ - अ) मराठी/हिंदी/इंग्रजी या भाषेतील वृत्तपत्रांना अधिक प्रमाणात जाहिराती मिळणे स्वाभाविक आहे. तथापि, अन्य भाषेतील वृत्तपत्रांनाही जाहिरातीचे वितरण संबंधित शासकीय विभागाची शिफारस लक्षात घेऊन तारतम्याने करण्यात येईल.

१७ - ब) या सर्व भाषांमधील वृत्तपत्रांना शासनमान्य यादीत समाविष्ट करुन घेतांना त्यांच्याकडून शासनमान्य यादीत समाविष्ट होण्याचे सर्व निकषांची पूर्ती होणे आवश्यक आहे.

१८. स्मरणिका :

एका आर्थिक वर्षात एका संस्थेच्या फक्त एकाच स्मरणिकेला शासनाची दर्शनी जाहिरात देण्यात येईल. स्मरणिकांचे व्यावसायिक दर कितीही असले तरी स्मरणिकेस जास्तीत जास्त रुपये २,०००/- मूल्याचीच जाहिरात देता येऊ शकेल व या मूल्यात शासनाची पूर्णपान जाहिरात छापणे बंधनकारक राहील. स्मरणिकेच्या कमीत कमी १००० प्रती छापणे आवश्यक असून स्मरणिका २३ x १७.५० सें.मी. आकारात प्रसिध्द करणे बंधनकारक राहील.

१९. दर्शनी जाहिराती समान आकारात :

दर्शनी जाहिराती या आर्टपूल्स स्वरुपात एका ठराविक आकारात देण्यात येतात. केवळ मजकूर द्यावयाचा झाल्यास तो संबंधित जाहिरातीच्या विहित आकारात छापण्याचे बंधन वृत्तपत्र/नियतकालिकांवर राहील.

२०. एखाद्या शासकीय विभागाच्या निर्णयावर आधरित, योजनांवर आधारित विकास कामांची माहिती देणारी, संदेशात्मक दर्शनी जाहिरात माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत प्रसिद्धीसाठी वितरित करावयाची झाल्यास त्या जाहिरात प्रसिद्धीसाठी लागणारा संपूर्ण निधी त्या संबंधित विभागाने त्यांच्या अर्थसंकल्पीय अनुदानात राखून ठेवणे बंधनकारक राहील.

२१. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत वृत्तपत्रांना वितरित करण्यासाठी शासनाच्या विविध विभागांच्या ज्या वर्गीकृत जाहिराती प्राप्त होतात त्या प्रसिध्दी तारखेपूर्वी किमान १० दिवस आधी महासंचालनालय किंवा महासंचालनालयाच्या संबंधित कार्यालयाकडे पाठविणे प्रत्येक शासकीय विभागास बंधनकारक राहील.

ज्या शासकीय विभागाच्या जाहिराती प्रसिध्दी दिनांकापूर्वी १० दिवस आधी संबंधित कार्यालयास प्राप्त होणार नाहीत अशा जाहिराती वृत्तपत्रांना प्रसिध्दीसाठी वितरित केल्या जाणार नाहीत व त्या जाहिराती त्या संबंधित कार्यालयाकडे परत पाठविण्यात येतील. (अत्यंत अपवादात्मक प्रसंगी ही कालमर्यादा त्या जाहिरातींचे महत्त्व लक्षात घेऊन शिथील केली जाईल. रोजच्या रोज हस्ते वटवड्यानें जाहिराती घेऊन वितरित करण्याच्या एखाद्या अधिकाऱ्याचा/विभागाचा कल दिसल्यास त्या अधिकाऱ्यावर कार्यवाही करण्याचे अधिकार महासंचालकांना राहतील.

२२. शासनमान्य यादीत समाविष्ट असलेल्या वृत्तपत्रांच्या तीन ऐच्छिक तसेच शासनमान्य यादीत समाविष्ट नसलेल्या दैनिकांच्या, साप्ताहिकांच्या, इतर नियतकालिकांच्या दर्शनी जाहिरातींचे अर्ज हे फक्त संबंधित विभागाच्या विभागीय माहिती उपसंचालकांमार्फत महासंचालनालयाकडे पाठविणे बंधनकारक राहील. असे अर्ज मंजुरीसाठी मुख्यालयाकडे पाठवितांना संबंधित विभागीय माहिती उपसंचालक यांनी त्या संबंधित वृत्तपत्र/नियतकालिकांचा दर्जा, खप याबाबतचा आपला अभिप्राय नोंदविणे आवश्यक राहील. मुंबई विभागातील असे दर्शनी जाहिरातींचे अर्ज माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या मुख्यालयातील जाहिरात शाखेत देणे बंधनकारक राहील. जाहिरात शाखेतील नियंत्रक अधिकाऱ्यांने वृत्तपत्रांचा दर्जा व नियमिततेच्या अभिप्रायासह हे अर्ज मंजूरीसाठी सादर करावेत. दर्शनी जाहिरातींचे मागणी अर्ज मंजूरीसाठी महासंचालनालयाकडे पाठवितांना खालीलप्रमाणे अंमलबजावणी होणे आवश्यक आहे.

२२ - अ) मा.महासंचालक यांच्या अधिकारातील दर्शनी जाहिरातीचे अर्ज विभागीय माहिती उपसंचालक यांच्या अभिप्रायासह ज्या प्रसंगासाठी जाहिरात मागणी असेल त्या प्रसंगाआधी किमान पंधरा दिवस महासंचालनालयास प्राप्त होणे बंधनकारक राहील.

२२ - ब) यापेक्षा अधिक मूल्याची मागणी असलेले अर्ज ज्या प्रसंगासाठी दर्शनी जाहिरातीची मागणी असेल त्याप्रसंगापूर्वी किमान एक महिना आधी महासंचालनालयास प्राप्त होणे बंधनकारक राहील.

२३. शासनमान्य यादीतील तसे शासनमान्य यादीत समाविष्ट नसलेल्या वृत्तपत्र नियतकालिकांना ज्या विशेष प्रसंगासाठी दर्शनी जाहिरात मंजूर झाली असेल त्या विशेष

प्रसंगाच्या दिवशीच ती जाहिरात प्रसिध्द करणे बंधनकारक राहील. त्या विशेष प्रसंगापूर्वी किंवा त्या विशेष प्रसंगानंतर प्रसिध्द करण्यात आलेल्या दर्शनी जाहिरातीचे देयक अदा केले जाणार नाही. साप्ताहिकांनी अशा विशेषप्रसंगाची जाहिरात त्या विशेष प्रसंगाच्या सप्ताहात प्रसिध्द करणे आवश्यक आहे.

२४. अपवादात्मक परिस्थितीत एखाद्या शासकीय विभागाने जाहिरात प्रसिध्दीसाठी वृत्तपत्रांची नांवे सुचविल्यास त्या जाहिरातींचे महत्व लक्षात घेऊन त्या निर्देशित केलेल्या वृत्तपत्रांनाच जाहिरात प्रसिध्दीस देण्याबाबत मा.महासंचालक यांना निर्णय घेता येईल.

२५. शासनमान्य यादीचे दर दोन वर्षानी नुतनीकरण करतांना जिल्हा माहिती अधिकारी यांनी आपल्या अहवालासोबत वृत्तपत्रांकडून आर.एन.आय.(रजिस्ट्रार ऑफ न्यूजपेपर ऑफ इंडिया) ला पाठविण्यात येणा-या (Annual Statemen) वार्षिक अहवालाची प्रतही पाठवावी.

२६. सर्व वर्गीकृत जाहिरातींमध्ये माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाचा/शासनाचा लोगो (लामणदिवा) छापणे बंधनकारक राहील.

२७. गेल्या काही वर्षात इलेक्ट्रॉनिक्स् प्रसारमाध्यमांचा फार झपाटयाने प्रसार झाल्याचे दिसत आहे. त्यात उपग्रह वाहिन्या, केबल वाहिन्या आणि लहान मोठया वेबसाईटस्चा समावेश आहे.या माध्यमातील प्रतिनिधींकडूनही शासनाच्या दर्शनी जाहिरातीची मागणी येऊ लागली आहे. या माध्यमाचा प्रभाव लक्षात घेता त्यांच्या मागणीचा सकारात्मक विचार करण्यात येईल. संबंधित कार्यपद्धती महासंचालनालयामार्फत निश्चित करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

न. कुमार

(नविन कुमार)
शासनाचे प्रधान सचिव



एचसी ३२१-४ (५,०००-५-२००१)

प्रति
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव/उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव/अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीनविभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
प्रबंधक, लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
संचालक,(माहिती), नागपूर-अमरावती,
संचालक,(माहिती),महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली,
उपसंचालक,(माहिती) नाशिक,पुणे,औरंगाबाद,अमरावती,कोकण,कोल्हापूर विभाग
सर्व जिल्हा माहिती अधिकारी,
सर्व उप माहिती कार्यालये.
निवड नस्ती.

## परिशिष्ट - ब

**शासनमान्य यादीत नाव समाविष्ट करण्यासाठी किंवा शासनमान्य यादीतील सध्याचा दर / सध्याची श्रेणी वाढवून मिळण्यासाठी करावयाच्या अर्जाचा नमुना**

| | | |
|---|---|---|
| १. | वृत्तपत्राचे नांव | : |
| २. | स्थापनेची तारीख | : |
| ३. | प्रकाशनाचे ठिकाण | : |
| ४. | वृत्तपत्राची भाषा | : |
| ५. | वृत्तपत्राची नियतकालिकता | : |
| ६. | संपादकाचे नांव | : |
| ७. | प्रकाशकाचे नांव | : |
| ८. | मुद्रणालयाचे नांव व पत्ता | : |
| ९. | नवीन अर्ज / दरवाढ / श्रेणीवाढ | : |
| १०. | वृत्तपत्र शासन मान्य यादीत समाविष्ट असल्यास त्याचा वर्ग. | : |
| ११. | वृत्तपत्र अधिपरिक्षक, पुस्तके व प्रकाशने, मुंबई कार्यालयात नियमित पाठविले जाते का ? नसल्यास त्याची कारणे | : |
| १२. | खपाचे आकडे देताना राज्य विभागीय व जिल्हा पातळीवरील खपाची विगतवारी (ब्रेकअप) देण्यात यावी (ए.बी.सी., चार्टर्ड अकाउंटंट किंवा मान्यवर लेखा तपासणीस संस्था ह्यांनी तपासून विहित नमुन्यात प्रमाणित केलेले आकडे प्रमाणपत्रासह नमूद करावेत) | : |
| १३) | 'अ' वर्ग वृत्तपत्र असल्यास ए.बी.सी.प्रमाणपत्रानुसार खप. | : |

१४) दरवाढ / श्रेणीवाढीसाठी, खपात वाढ झाल्यास त्यांची कारणे. :

१५) आयकर व विक्रीकर भरला जातो का ? (असल्यास त्याची: प्रमाणपत्रे जोडावित)

१६) तांत्रिक बाबींची माहिती

अ) आकार :

ब) पृष्ठ संख्या

क) अन्य मजकूर व जाहिरात मजकुराचे सरासरी प्रमाण :

ड) अग्रलेख नित्यनेमाने असतो काय ? त्याची सरासरी :

ई) छपाई यंत्राचे नाव व प्रकार :

प) छपाई यंत्राची क्षमता :

फ) कागदाचा सरासरी वापर :
(कागद खरेदीची देयके आवश्यक आहेत.)

ग) रजिस्ट्रार ऑफ न्यूजपेपर्सने दिलेल्या पंजीयन प्रमाणपत्राची झेरॉक्स प्रत. :

ह) पोस्टाच्या सवलतीच्या दराने प्रती रवाना करण्याबाबतच्या प्रमाणपत्राची झेरॉक्स प्रत :

१७) ह्याच संपादक-मालकाची किंवा कुटूंबाची अन्य वृत्तपत्रे आहेत काय? असल्यास त्याची माहिती व त्यापैकी किती वृत्तपत्रे शासनमान्य जाहिरात यादीवर आहेत. :

१८) वृत्तपत्राची आवृत्ती असल्यास छापाईचे ठिकाण :

१९) अन्य वृत्तपत्रे शासनमान्य यादीवर असल्यास त्याचा सद्याचा जाहिरात दर :

२०) आर.एन.आय.मार्फत खपाची पडताळणी झाली का ? :

२१) असल्यास, त्यांनी मान्य केलेला खप :

२२) वृत्तपत्राचे स्वत:चे जाहिरात दरपत्रक (वाणिज्य दर) :

२३) डी.ए.व्ही.पी.ची मान्यता आहे काय? असल्यास त्यांनी मंजूर केलेला जाहिरात दर :

२४) गत सहा महिन्यांतील अंकाच्या प्रतींची फाईल :

२५) रजिस्ट्रार ऑफ न्यूजपेपर्स ऑफ इंडिया ह्यांना सादर केलेल्या खपासंबंधीच्या विवरणपत्राची झेरॉक्स प्रत. :

२६) वेतन आयोगाप्रमाणे वेतन दिले जाते का ? :

२७) जादा आकार मिळण्यासाठी आवश्यक असलेल्या बाबीसंबंधी माहिती :

१. वृत्तसेवांचा (पीटीआय,यूएनआय) वापर :

२. संगणकीय अत्याधुनिक सेवा(इंटरनेट, ई-मेल, मोडेम इ.):

३. अत्याधुनिक छपाईयंत्राचा वापर - :
अ) फोटो कंपोझिंग आणि ऑफसेट पद्धतीची छपाई.

४. वृत्तपत्र ए.बी.सी.चे सदस्य आहे काय? :

५. वृत्तपत्र २५ वर्षाहून अधिक काळ सातत्याने चालू आहे काय ? :

उपरोक्त माहिती वस्तुस्थितीदर्शक आहे.

संपादकाची / मुद्रकाची / प्रकाशकाची सही/शिक्का
व दिनांक

## परिशिष्ट - क

CIRCULATION OF DAILY / WEEKLY________________ FOR THE YEAR ____________ Name of the Newspaper / Periodical & periodicity ________ Publication Place :-____________Language ________ THE BREAK UP OF THE CIRCULATION MONTHWISE FROM ________ TO ____

| Sr. No. | Month | Printed copies | Size in sq. cm. | No.of pages | Actual No. of publishing daily weekly | Sold Copies | | Complimentary/ free copies | Avearage copies for period of audit |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | Subscrip-tion copies | Sales thorugh Agents | | |
| 1. | | | | | | | | | Printed Sold |
| 2. | | | | | | | | | |
| 3. | | | | | | | | | |
| 4. | | | | | | | | | |
| 5. | | | | | | | | | |
| | | | | | | | | | |
| | | | | | | | | | |
| Total | | | | | | | | | |

## CERTIFICATE

We certify that from the record of issues shown and information given the break up of the circulation of Daily/weekly________ -----________________ ________as on_________________ is as under :-

The Break up of circulation : (Talukawise / Districtwise)

| Sr. No. | Name of Taluka / District | Sold Copies | |
|---|---|---|---|
| | | Subscription copies | Sales through Agents |
| 1. | | | |
| 2. | | | |
| 3. | | | |
| Total = | | | |

We have examined the books and accounts and circulation of M/s____________ _____________________published for the year ________ to _________and have obtained all the information and explanation required by us. In our opinion the statement set forth above, reflects true and correct analysis of circulation for the year from ___________ to _________to the best of our information and belief and according to the explanation given to us by the books of accounts etc.

Date :
Stamp of Chartered Accountant

## परिशिष्ट - ड

### शासनमान्य यादीवर असलेले वृत्तपत्र शासनमान्य यादीत ठेवावयाचे किंवा कमी करवयाचे याबाबत संबंधित जिल्हा माहिती अधिकाऱ्यांनी भरुन द्यावयाच्या प्रमाणपत्राचा नमुना

शासनमान्य यादीवरील खाली नमूद केलेल्या वृत्तपत्राची निकषानुसार माहिती पुढीलप्रमाणे आहे.

१. वृत्तपत्राचे नांव :
२. वृत्तपत्राची भाषा / नियतकालिकता :
३. वृत्तपत्राचा सध्याचा वर्ग व जाहिरात दर :
४. संपादकाचे नांव :
५. मुद्रकाचे नांव :
६. मुद्रणालयाचे नांव व पत्ता :
७. वृत्तपत्र नियमित आहे का ? होय / नाही :
८. गत सहा महिन्यात प्रसिद्ध झालेल्या अंकांची संख्या :
९. त्यापैकी किती अंकात अग्रलेख होता. :
१०. पृष्ठ संख्या व आकार :
११. कॉलमची संख्या :
१२. मजकूर व जाहिरातीचे प्रमाण :
१३. लिखाणाचा दर्जा :
१३-अ) राष्ट्रीय ऐक्यास बाधा, जातीजातीत तेढ यासारखे पितपत्रकारीतेस उत्तेजन देणारे लिखाण असते का ? :
१४. वृत्तपत्र ए.बी.सी. प्रमाणपत्र धारक आहे का : असल्यास अलिकडचे प्रमाणपत्र.
१५. सनदीलेखापाल यांचे खपाबाबतचे प्रमाणपत्रानुसार खप (प्रमाणपत्र) :
१६. खास नमूद करण्यासारख्या बाबी :
१७. शासनाने प्रमाणित करुन दिलेला शासनमान्य : यादीतील सध्याचा खप व त्याबाबतचे प्रमाणपत्र.
१८. संबंधित वृत्तपत्राने आर.एन.आय.ला : पाठविलेल्या वार्षिक अहवालाची प्रत.

जिल्हा माहिती अधिकारी यांची
सही व शिक्का